राष्ट्रीय खाद्य तेल अभियानातंर्गत (NMEO) (गळीतधान्य व तेलताड) सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र व राज्य हिश्याचा तसेच, मूलभूत बियाणे खरेदी MH-५९० या State Linked Scheme (SLS) अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी पुनर्विनियोजनाद्वारे रू.१८०३.८७३४ लाख इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राखातेअ-२०२५/प्र.क्र.१९/४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राखातेअ -२०२४/प्र.क्र.४४/४-अे, दि.३१/०१/२०२५.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र. ०६-१४/२०२३-AAP/Coord(OilSeed), दि.३१/१/२०२५.
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राखातेअ -२०२५/प्र.क्र.१९/४-अे, दि.१८/०३/२०२५.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. ०६-१४/२०२४-KY (FTS-१५२६३६), दि.२०/०३/२०२५.
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राखातेअ -२०२५/प्र.क्र.०५/४-अे, दि.२१/०३/२०२५.
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. अपोसु -२०२५/प्र.क्र.०६/४-अे, दि.२१/०३/२०२५.
७. कृषी आयुक्तालयाचे जा.क्र.राखातेअ/अ.वा.मा./पुनर्वि.प्रस्ताव/प्र.क्र.०५/७२(र/२४), दि.२१/०३/२०२५

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने दि. २० मार्च, २०२५ च्या पत्रान्वये कृषी उन्नती योजनेतील दुसऱ्या टप्यातील प्रदान केलेल्या Mother Sanction मध्ये राष्ट्रीय खाद्य तेल अभियानांतर्गत (गळीतधान्य व तेलताड) राष्ट्रीय खाद्य तेल अभियान-तेलबिया (६०:४०) MH-१२ या SLS साठी रू.२७.०८४८ कोटी व मूलभूत बियाणे खरेदी MH-५९० (१०० टक्के केंद्र हिस्सा) या SLS साठी रु. ६.०७०४ कोटी असा एकूण केंद्र हिस्सा रु. ३३.१५५२ या कोटी इतका दर्शविला आहे.

राष्ट्रीय खाद्य तेल अभियानांतर्गत (गळीतधान्य व तेलताड) सन २०२४-२५ या वर्षासाठी दुसऱ्या हप्त्याचा तिन्ही प्रवर्गाकरिता एकूण रू.३०१७.०४८३ लाख (केंद्र हिस्सा रू.१८१०.२२९० लाख +राज्य हिस्सा रू.१२०६.८१९३ लाख) निधी अर्थसंकल्पित तरतुदीच्या अधीन राहून संदर्भ क्र.५ अन्वये आयुक्त कार्यालयास वितरित केला आहे. त्यापैकी, सर्वसाधारण प्रवर्गासाठी सद्यस्थितीत रु. २३.६१ कोटी (केंद्र हिस्सा रु. १४.१७ कोटी राज्य हिस्सा रु. ९.४५ कोटी) निधी वितरीत केला आहे.

सद्यस्थितीत राष्ट्रीय खाद्य तेल अभियान-तेलबिया अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी एकूण रू. ११९६.८३३४ लाख (केंद्र हिस्सा रू.७१८.१० लाख + राज्य हिस्सा रु.४७८.७३३४ लाख) व मूलभूत बियाणे खरेदी (१०० टक्के केंद्र हिस्सा ) या घटकासाठी रू. ६०७.०४ लाख असे एकूण रू.१८०३.८७३४ लाख इतक्या तरतुदीची आवश्यकता आहे. सदर निधी अन्न व पोषण सुरक्षा अभियानामधून पुनर्विनियोजनाद्वारे अर्थसंकल्पीत करून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

१.राष्ट्रीय खाद्य तेल अभियान-तेलबिया अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी एकूण रू. ११९६.८३३४ लाख (केंद्र हिस्सा रू.७१८.१० लाख + राज्य हिस्सा रु.४७८.७३३४ लाख) व मूलभूत बियाणे खरेदी (१०० टक्के केद्र हिस्सा ) या घटकासाठी रू. ६०७.०४ लाख असे एकूण रू.१८०३.८७३४ लाख इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून देण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२.पुनर्विनियोजनाद्वारे रू.१८०३.८७३४ लाख इतकी तरतूद वर्ग करण्याचा लेखाशीर्षनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे,

**अ) केंद्र हिस्सा- सर्वसाधारण प्रवर्ग**

(रु. लाखात)

| अ. क्र. | रा.ख.ते.अ. अंतर्गत SLS नाव | लेखाशीर्ष | अर्थ संकल्पीत तरतूद | वितरीत तरतूद | अवितरीत तरतूद | प्रस्तावित पुनर्विनियोजन | पुनर्विनियोजनानंतर उपलब्ध राहणारी एकूण तरतुद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ (४+७) |
| १ | MH-10 Krishonnati Yojana- Food & Nutritional Security | मागणी क्र. डी-०३, २४०१-पीकसंवर्धन, (००)(१०२) अन्नधान्ये पिके (००) (२५) कृषी उन्नती योजना-राष्टीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्ये पिके (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१४६१४) (योजनाअंतर्गत) (दत्तमत ) ३३, अर्थसहाय्य | १४७२४.६० | १२३०१.०७ | २४२३.५३ | -१३२५.१८ | १३३९९.४२ |
| २ | MH-12 Krishonnati Yojana- National Mission on Edible Oil- Oilseed | मागणी क्र. डी-०३, २४०१-पीकसंवर्धन, ११४, तेलबिया, (००) (०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, लघु अभियान-१ (तेलबिया) (के.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१-२४९८), ३३-अर्थसहाय्य | ३९३२.०० | ३९३२.०० | ०० | +७१८.१० | ४६५०.१० |
| ३ | MH-590 Breeder Seed Purchase- Oilseed | मागणी क्र. डी-३, २४०१- पीक संवर्धन, १०८, वाणिज्यिक पिके, (०२) (०८), राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-ऊस (केंद्र हिस्सा ६० %) (केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१-४०५१) (योजनांतर्गत) (दत्तमत), ३३ अर्थसहाय्य | ३४६.०१ | ३४६.०१ | ०.०० | +६०७.०४ | ९५३.०५ |

**ब) राज्य हिस्सा -सर्वसाधारण प्रवर्ग**

(रु. लाखात)

| अ. क्र. | रा.ख.ते.अ. अंतर्गत SLS नाव | लेखाशीर्ष | अर्थ संकल्पीत तरतूद | वितरीत तरतूद | अवितरीत तरतूद | प्रस्तावित पुनर्विनियोजन | पुनर्विनियोजनानंतर उपलब्ध राहणारी एकूण तरतुद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ (४+७) |
| १ | MH-10 Krishonnati Yojana- Food & Nutritional Security | मागणी क्र. डी-०३, २४०१-पीकसंवर्धन, (००)(१०२) अन्नधान्ये पिके (००) (३३) कृषी उन्नती योजना-राष्टीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्ये पिके (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ए२३४) (योजनाअंतर्गत) (दत्तमत ) ३३, अर्थसहाय्य | ९८१५.४६ | ८२००.७१३३३ | १६१४.७४६६७ | - ४७८.७३३३४ | ९३३६.७२६६६ |
| २ | MH-12 Krishonnati Yojana- National Mission on Edible Oil- Oilseed | मागणी क्र . डी ३, लेखाशीर्ष २४०१- पीकसंवर्धन, ११४, तेलबिया, (००) (०१) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान, उप अभियान-१ (तेलबिया) (जिल्हा परिषद) (राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१-१५३५), ३३-अर्थसहाय्य | २८५२.०० | २८५२.०० | ० | +४७८.७३३३४ | ३३३०.७३३३४ |

३.	या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच, निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४.	या शासन निर्णयान्वये वितरीत निधी खर्च करताना, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या, तसेच, नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५.	सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र.१८०/२०२५/१४३१, दि.२७/०३/२०२५ व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१५०/२०२५/व्यय-१,दि.२८०३/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१६२६३७१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

RUCHITA RANJAN PIMPLE

Digitally signed by RUCHITA RANJAN PIMPLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=4d2e14e1b5b622285a319d549438716bc45686280aac03bea60829e714c19298, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E83BB07DDF0C67032F513E6336E3EE49F53DC047998C7012096DD9C8059D5FE, cn=RUCHITA RANJAN PIMPLE
Date: 2025.03.28 16:30:55 +05'30'

**(रुचिता पिंपळे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रती:-**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१०) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१२) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१३) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१७) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१८) वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती.